# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्र. पूरक-०२२१/ प्र.क्र.३४३/ पोल-७**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

**दिनांक १८ फेब्रुवारी, २०२२.**

**विषय:-** **पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील मंचर पोलीस स्टेशन जवळ आर्थिक गुन्हे शाखा, सायबर पोलीस स्टेशन व जिल्हा वाहतूक शाखेचे उपकेंद्र सुरु करण्यासाठी इमारत बांधकामासाठी निधी वितरण करण्याबाबत.**

**संदर्भ:-** १. शासन ज्ञापन, गृह विभाग क्र. पोप्रमा-०१२१/प्र.क्र.३४०/पोल-७, दि.१६/१२/२०२१

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-०१२१/प्र.क्र.५८/अर्थ-३, दिनांक २८ जानेवारी, २०२२

ज्ञापन :-

**पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण), यांच्या आस्थापनेवरील मंचर पोलीस स्टेशन जवळ आर्थिक गुन्हे शाखा, सायबर पोलीस स्टेशन व जिल्हा वाहतूक शाखेचे उपकेंद्र सुरु करण्यासाठी इमारत बांधकामासाठी रु.८,९६,६७,४९५/- इतक्या खर्चाच्या अदाजपत्रकास** शासन ज्ञापन, गृह विभाग क्र.पोप्रमा-०१२१/प्र.क्र.३४०/पोल-७, दि.१८ डिसेबर, २०२१ द्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. **उक्त कामासाठी,** गृह विभाग- **मागणी क्र.बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (कार्यक्रम), (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे,** या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षात पुरक अनुदान म्हणून **₹ ८९,६७,०००/- (रुपये एकोणनव्वद लाख सदुसष्ठ हजार फक्त** ) इतकी रक्कम पोलीस महासंचालय, म.रा., यांना अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर वितरण करण्यास, याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

३. उक्त रक्कम **₹ ८९,६७,०००/- (रुपये एकोणनव्वद लाख सदुसष्ठ हजार फक्त)** अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यासाठी **पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई** यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हे ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६/२०२२/व्यय-७, दिनांक ०२.०२.२०२२, अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२१८१५१३४७४२२९ असा आहे. हा शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD KAILAS ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2022.02.18 15:16:37 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (अर्थसं.-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण
६) निवड फाईल (पोल-७).